

# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष १, अंक २१] गुरुवार, ऑगस्ट २०, २००९/श्रावण २९, शके १९३१ [पृष्ठे ५, किंमत : रुपये १८.००

असाधारण क्रमांक ४१

प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.

अनुक्रमणिका



## ग्रामविकास व जलसंधारण विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २० ऑगस्ट २००९.

## MAHARASHTRA ORDINANCE No. XV OF 2009.

AN ORDINANCE TO PROVIDE FOR TEMPORARY POSTPONEMENT OF ELECTIONS OF THE PRESIDENT, VICE-PRESIDENT AND CHAIRMEN OF THE SUBJECTS COMMITTEES OF CERTAIN ZILLA PARISHADS AND THE CHAIRMAN AND DEPUTY CHAIRMAN OF CERTAIN PANCHAYAT SAMITIS, ON ACCOUNT OF ENSUING GENERAL ELECTIONS TO THE STATE LEGISLATIVE ASSEMBLY.

## सन २००९ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १५.

**राज्य विधानसभेच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांमुळे विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती या पदांसाठी होणाऱ्या निवडणुका तात्पुरत्या पुढे ढकलण्याची तरतूद करण्याकरिता अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणुका ऑक्टोबर, २००९ या महिन्यात केव्हातरी घेण्यात येण्याची शक्यता आहे ;

**आणि ज्याअर्थी,** विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांचा पदावधीदेखील सप्टेंबर, २००९ मध्ये समाप्त होणार आहे ;

**आणि ज्याअर्थी,** महाराष्ट्र विधानसभेच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांमुळे जिल्ह्यातील जिल्हाधिकाऱ्यांचा सर्व अधिकारी व कर्मचारी वर्ग तसेच जिल्ह्यांतील पोलीस कर्मचारीवर्ग, महाराष्ट्र विधानसभेच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांच्या तयारीमध्ये कार्यव्यग्र आहे, आणि तो, निवडणूकपूर्व आणि निवडणुकीनंतरच्या कामामध्ये पूर्णपणे व्यस्त राहणार आहे ;

**आणि ज्याअर्थी,** उक्त निवडणुकांची कोणतीही संभाव्य परस्परव्याप्ती टाळण्यासाठी आणि नागरी व पोलीस प्रशासनावरील कोणताही संभाव्य अवास्तव ताण आणि कायदा व सुव्यवस्थेबाबत कोणतीही समस्या किंवा नागरिकांची गैरसोय टाळण्यासाठी, विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती या पदांच्या निवडणुका चार महिन्यांच्या कालावधीसाठी तात्पुरत्या पुढे ढकलणे इष्ट आहे असे वाटते ;

**आणि ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी,** उपरोक्त कारणांसाठी, विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती या पदांसाठीच्या निवडणुका तात्पुरत्या पुढे ढकलण्याची तरतूद करण्याकरिता महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तातडीने कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ;

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ. १. (१) या अध्यादेशास, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती (राज्य विधानसभेच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांमुळे विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती पदांसाठीच्या) निवडणुका तात्पुरत्या पुढे ढकलणे अध्यादेश, २००९ असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

व्याख्या. २. या अध्यादेशात, संदर्भानुसार दुसरा अर्थ अपेक्षित नसेल तर,—

(क) "पंचायत समिती" याचा अर्थ, जिल्हा परिषद अधिनियमा अन्वये घटित केलेली पंचायत समिती, असा आहे ;

(ख) "जिल्हा परिषद" याचा अर्थ, जिल्हा परिषद अधिनियमा अन्वये घटित केलेली जिल्हा परिषद, असा आहे;

१९६२ चा महा. ५. (ग) "जिल्हा परिषद अधिनियम" याचा अर्थ, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१, असा आहे;

(घ) या अध्यादेशात वापरलेले आणि यामध्ये व्याख्या न केलेले शब्द व शब्दप्रयोग यांना, जिल्हा परिषद अधिनियमामध्ये जो अर्थ नेमून दिलेला असेल तोच अर्थ असेल.

अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समित्यांचे सभापती आणि सभापती व उप सभापती पदांसाठी निवडणुका पुढे ढकलणे आणि त्यांचा पदावधी वाढविणे.

३. (१) जिल्हा परिषद अधिनियम किंवा त्याखाली करण्यात आलेले नियम किंवा कोणत्याही न्यायालयाचा कोणताही न्यायनिर्णय, हुकुमनामा किंवा आदेश यामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी,—

(क) हा अध्यादेश अंमलात आल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या कालावधीत किंवा राज्य शासन, **राजपत्रातील** अधिसूचनेद्वारे विनिर्दिष्ट करील अशा, त्याआधीच्या दिनांकापर्यंत (या अध्यादेशात यापुढे ज्याचा निर्देश "उक्त कालावधी" असा केला आहे), जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती या पदांसाठी कोणतीही निवडणूक घेण्यात येणार नाही ;

(ख) उक्त कालावधीनंतर निवडून द्यावयाचे जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांचा पदावधी हा, निवडून आलेल्या परिषद सदस्यांच्या किंवा यथास्थिति, सदस्यांच्या पदावधीबरोबरच समाप्त होणारा असेल.

(२) पोट-कलम (१) मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती, त्यांचा या अध्यादेशाद्वारे वाढविलेला पदावधी समाप्त झाल्यानंतरही, ते जिल्हा परिषद अधिनियमाखाली नवीन अध्यक्ष, उपाध्यक्ष आणि त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती निवडून येईपर्यंत, पद धारण करण्याचे चालू ठेवतील.

ज्यांचा पदावधी वाढविण्यात आला असेल असे अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समित्यांचे सभापती आणि सभापती व उप सभापती यांचे अधिकार आणि विवक्षित कृतींचे विधिग्राह्यीकरण.

४. ज्यांचा पदावधी कलम ३ अन्वये वाढविण्यात आला असेल किंवा, यथास्थिति, वाढविण्यात आला असल्याचे मानण्यात आले असेल, असे जिल्हा परिषदांचे सर्व अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सर्व सभापती व उप सभापती, अशा वाढविण्यात आलेल्या संपूर्ण कालावधीत, जिल्हा परिषदांचे असे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती म्हणून सर्व अधिकारांचा वापर करण्यास, सर्व कर्तव्यांचे पालन करण्यास व सर्व कार्ये पार पाडण्यास सक्षम असल्याचे मानण्यात येईल व ते सक्षम असतील ; आणि उक्त कालावधीमध्ये त्यांच्यापैकी कोणीही केलेली कोणतीही कृती, ही वाढविण्यात

आलेल्या कालावधीत, जिल्हा परिषदांच्या अशा अध्यक्षांना, उपाध्यक्षांना व त्यांच्या विषय समित्यांच्या सभापतींना आणि पंचायत समित्यांचे असे सभापती व उप सभापती यांना जिल्हा परिषद अधिनियमाखालील जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांच्या सर्व किंवा कोणत्याही अधिकारांचा वापर करता आला नव्हता, सर्व किंवा कोणत्याही कर्तव्याचे पालन करता आले नव्हते किंवा सर्व किंवा कोणतीही कार्ये पार पाडता आली नव्हती, याच केवळ कारणावरून अवैध ठरणार नाहीत किंवा त्या कृतीस कोणत्याही न्यायालयात आव्हान देण्यात येणार नाही.

अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समित्यांचे सभापती आणि सभापती व उप सभापती यांच्या निवडणुका घेण्याची व्यवस्था.

५. या अध्यादेशात काहीही अंतर्भूत असले तरी, या अध्यादेशाद्वारे वाढविलेला, जिल्हा परिषदांचे विद्यमान अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे विद्यमान सभापती व उप सभापती यांचा पदावधी संपण्यापूर्वी किंवा त्यानंतर, शक्य तितक्या लवकर, संबंधित अधिकाऱ्यांकडून, जिल्हा परिषद अधिनियमाच्या आणि त्याखालील नियमांच्या तरतुदींनुसार, जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांच्या निवडणुका घेण्याची व्यवस्था करण्यात येईल.

अडचण दूर करणे.

६. या अध्यादेशाच्या तरतुदी अंमलात आणताना किंवा त्यात अंतर्भूत असलेल्या कोणत्याही गोष्टीमुळे किंवा या अध्यादेशात अंतर्भूत असलेल्या कोणत्याही गोष्टीच्या बाबतीत, जिल्हा परिषद अधिनियमाच्या तरतुदी अंमलात आणताना कोणतीही अडचण उद्‌भवल्यास, राज्य शासनास, प्रसंगानुरुप, ती अडचण दूर करण्यासाठी, आदेशाद्वारे, त्यास आवश्यक वाटेल अशी कोणतीही गोष्ट करता येईल.

## निवेदन

राज्यातील, महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महा.५) याच्या विद्यमान तरतुदींनुसार, जिल्हा परिषदेचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांचा पदावधी अडीच वर्षे इतका आहे. काही जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांमधील जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांचा पदावधी सप्टेंबर २००९ मध्ये समाप्त होणार आहे.

२. राज्य विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणुका, २००९ च्या ऑक्टोबर महिन्यामध्ये केव्हा तरी घेण्यात येण्याची शक्यता आहे. महाराष्ट्र विधानसभेच्या उक्त सार्वत्रिक निवडणुकांमुळे, जिल्ह्यातील जिल्हाधिकाऱ्यांचा सर्व अधिकारी व कर्मचारीवर्ग तसेच जिल्ह्यामधील पोलीस कर्मचारीवर्ग उक्त सार्वत्रिक निवडणुकांच्या तयारीमध्ये कार्यव्यग्र आहे आणि तो, निवडणुकपूर्व आणि निवडणुकी नंतरच्या कामात पूर्णपणे व्यस्त राहणार आहे. उक्त निवडणुकांची कोणतीही संभाव्य परस्परव्याप्ती टाळण्यासाठी, आणि नागरी व पोलीस प्रशासन या वरील कोणताही संभाव्य अवास्तव ताण आणि कायदा व सुव्यवस्थेबाबत कोणतीही समस्या किंवा नागरिकांची गैरसोय टाळण्यासाठी, जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांच्या निवडणुका चार महिन्यांच्या कालावधीसाठी तात्पुरत्या पुढे ढकलणे इष्ट आहे असे वाटते.

३. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि राज्य विधानसभेच्या आगामी सार्वत्रिक निवडणुकांमुळे व अन्य विवक्षित तदानुषंगिक बाबींसाठी विवक्षित जिल्हा परिषदांचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व त्यांच्या विषय समित्यांचे सभापती आणि विवक्षित पंचायत समित्यांचे सभापती व उप सभापती यांच्या निवडणुका तात्पुरत्या पुढे ढकलण्याची तरतूद करण्यासाठी महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तातडीने कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे, अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे, म्हणून हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक १९ ऑगस्ट २००९.

**एस. सी. जमीर,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**बलदेव सिंह,**
शासनाचे सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A,NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004.





# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष १, अंक ३५] गुरुवार, ऑगस्ट २०, २००९/श्रावण २९, शके १९३१ [पृष्ठे ५, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ६२


प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधि व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Temporary Postponement of Elections (of the President, Vice-President and Chairmen of Subjects Committees of certain Zilla Parishads and Chairman and Deputy Chairman of certain Panchayat Samitis due to ensuing general elections to the State Legislative Assembly) Ordinance, 2009 (Mah. Ord. XV of 2009), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

[ Translation in English of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Temporary Postponement of Elections (of the President, Vice-President and Chairmen of Subjects Committees of certain Zilla Parishads and Chairman and Deputy Chairman of certain Panchayat Samitis due to ensuing general elections to the State Legislative Assembly) Ordinance, 2009 (Mah. Ord. XV of 2009), published under the authority of the Governor).

**RURAL DEVELOPMENT AND WATER CONSERVATION DEPARTMENT**

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 20th August 2009.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XV OF 2009.**

*AN ORDINANCE*

*to provide for temporary postponement of elections of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of certain Zilla Parishads and the Chairman and Deputy Chairman of certain Panchayat Samitis, on account of ensuing general elections to the State Legislative Assembly.*

WHEREAS general elections to the State Legislative Assembly are likely to be held sometime in the month of October 2009 ;

AND WHEREAS the term of offices of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of certain *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of certain *Panchayat Samitis* are due to expire in September 2009 ;

AND WHEREAS on account of ensuing general elections to the Maharashtra Legislative Assembly, all the officers and staff of the Collectors of the Districts as well as the police personnel in the Districts are busy with preparation for the ensuing general elections to the Maharashtra Legislative Assembly and would be totally occupied with the pre and post elections duties ;

AND WHEREAS to rule out any possible overlapping of the said elections and any possible undue pressure on civil and police administration and any law and order problem or inconvenience to the citizens, it is considered expedient to temporarily postpone the elections of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of certain *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of certain *Panchayat Samitis* for a period of four months ;

AND WHEREAS both Houses of the State Legislature are not in session ;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action to provide for temporary postponement of elections of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of certain *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of certain *Panchayat Samitis*, for the reasons aforesaid ;

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (*1*) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

Short title and commencement.

**1.** (*1*) This Ordinance may be called the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Temporary Postponement of Elections (of the President, Vice-President and Chairmen of Subjects Committees of certain *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of certain *Panchayat Samitis* due to ensuing general elections to the State Legislative Assembly) Ordinance, 2009.

(2) It shall come into force at once.

2. In this Ordinance, unless the context otherwise requires,— Definitions.

(*a*) "*Panchayat Samiti*" means a *Panchayat Samiti* constituted under the Zilla Parishads Act;

(*b*) "*Zilla Parishad*" means a *Zilla Parishad* constituted under the Zilla Parishads Act;

Mah. V of 1962. (*c*) "Zilla Parishads Act" means the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961;

(*d*) words and expressions used in this Ordinance and not defined herein shall have the meanings assigned to them in the Zilla Parishads Act.

**3.** (*1*) Notwithstanding anything contained in the Zilla Parishads Act or the rules made thereunder or in any judgement, decree, or order of any Court,— Postponement of elections of Presidents, Vice-Presidents, and Chairmen of Subjects Committees and Chairman, Deputy Chairman and extension of term of their office.

(*a*) no election to the office of the President, Vice-President and the Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* shall be held for a period of four months from the date of coming into force of this Ordinance, or such earlier date as the State Government may, by notification in the *Official Gazette*, specify (hereinafter in this Ordinance referred to as "the said period");

(*b*) the term of offices of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* to be elected after the said period shall be co-terminus with the term of the elected councillors or members, as the case may be.

(*2*) Notwithstanding anything contained in sub-section (*1*), after the term of offices of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* as extended by this Ordinance expires, they shall continue to hold office until the new President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* have been elected under the Zilla Parishads Act.

Powers of President, Vice-President and Chairmen of Subjects Committees and Chairman and Deputy Chairman whose term of office stands extended and validation of certain acts.

4. All the Presidents, Vice-Presidents and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*, whose term of offices are deemed to have been extended or are extended, as the case may be, under section 3, shall, throughout such extended period, be deemed to have been and be competent to exercise all the powers, perform all the duties and discharge all the functions as such President, Vice-President and the Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* ; and no act done by any of them during said period shall be invalid, or shall be called in question in any Court, merely on the ground that during such extended period, the President, Vice-President and the Chairmen of the Subjects Committees and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*, could not exercise all or any of the powers or perform all or any of the duties or discharge all or any of the functions of the President, Vice-President and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* under the Zilla Parishads Act.

Arrangements to hold elections of Presidents, Vice-Presidents and Chairmen of Subjects Committees and Chairman and Deputy Chairman.

5. Notwithstanding anything contained in this Ordinance, arrangements shall be made by the officers concerned to hold the elections of the Presidents, Vice-Presidents and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*, in accordance with the provisions of the Zilla Parishads Act and the rules made thereunder, before, or as soon as possible, after the expiration of the extended term of office of the existing Presidents, Vice-Presidents and Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*.

Removal of difficulty.

6. If any difficulty arises in giving effect to the provisions of this Ordinance or by reason of anything contained therein, or in giving effect to the provisions of the Zilla Parishads Act in respect of any matter contained in this Ordinance, the State Government may, as occasion arises, by order, do anything which appears to it to be necessary for the purpose of removing the difficulty.

STATEMENT

As per the existing provisions of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962), the tenure of the offices of the Presidents, Vice-Presidents and the Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis* is two and a half years. In some of the *Zilla Parishads* and *Panchayat Samitis*, the term of offices of the Presidents, Vice-Presidents and the Chairmen of the Subjects Committees of the Zilla Parishads and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*, is due to expire in the month of September 2009.

2. The general elections to the State Legislative Assembly are likely to be held sometime in the month of October 2009. On account of the said general elections to the Maharashtra Legislative Assembly, all officers and staff of the Collectors of the Districts as well as the police personnel in the Districts are busy with preparation for the said general elections and would be totally occupied with the pre and post election duties. To rule out any possible overlapping of the said elections and any possible undue pressure on civil and police administration and any law and order problem or any inconvenience to the citizens, it is considered expedient to temporarily postpone the elections of the Presidents, Vice-Presidents and the Chairmen of the Subjects Committees of the *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of the *Panchayat Samitis*, for a period of four months.

3. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action to provide for temporary postponement of elections to the offices of the Presidents, Vice-Presidents and the Chairmen of the Subjects Committees of certain *Zilla Parishads* and the Chairman and Deputy Chairman of certain *Panchayat Samitis*, for a short period on account of ensuing general elections to the State Legislative Assembly and for certain other incidental matters, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 19th August 2009.

S. C. JAMIR,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

BALDEV SINGH,
Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004.